**सन २०२३ च्या खरीप हंगामामधील कापूस व सोयाबीन उत्पादक शेतकऱ्यांना अर्थसहाय्य देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२४ /प्र.क्र. ४५ / ४ अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २९ जुलै, २०२४

**वाचा :** १) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. विकृयो-२१२२/ प्र.क्र.३९/०४ अे, दि.१२ मे, २०२२
२) मा.मुख्य सचिव कार्यालयाची दि.२४ जुलै, २०२४ ची टिप्पणी.

<u>प्रस्तावना :-</u>

मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री वित्त यांनी दि.०५ जुलै,२०२४ रोजी, सन २०२४-२५ च्या अतिरिक्त अर्थसंकल्पीय भाषणामध्ये, कापूस व सोयाबीन पिकांचा राज्याच्या शेती उत्पन्नामध्ये मोठा वाटा आहे, मागील वर्षी आंतरराष्ट्रीय घडामोडी व अन्य कारणांमुळे झालेल्या किंमतीतील घसरणीमुळे शेतक-यांना नुकसान सोसावे लागले, शेतक-यांना दिलासा देण्यासाठी खरीप पणन हंगाम २०२३-२४ मध्ये कापूस व सोयाबीन उत्पादक शेतक-यांना दोन हेक्टरच्या मर्यादेत प्रति हेक्टरी ५ हजार रुपयांचे अर्थसहाय्य देण्याची घोषणा केली आहे.

या घोषणेच्या अनुषंगाने राज्यातील सन २०२३ च्या खरीप हंगामातील कापूस व सोयाबीन उत्पादक शेतकऱ्यांना ०.२ हेक्टरपेक्षा कमी क्षेत्रासाठी सरसकट रु.१००० तर ०.२ हेक्टरपेक्षा जास्त क्षेत्रासाठी त्यांच्या क्षेत्रानुसार प्रती हेक्टर रु.५,००० (२ हेक्टरच्या मर्यादेत) अर्थ सहाय्य देण्यासाठीच्या प्रस्तावास मा.मंत्रिमंडळाच्या दि.११ जूलै, २०२४ च्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:**

१. राज्यातील सन २०२३ च्या खरीप हंगामातील कापूस व सोयाबीन उत्पादक शेतकऱ्यांना ०.२ हेक्टरपेक्षा कमी क्षेत्रासाठी सरसकट रु.१००० तर ०.२ हेक्टरपेक्षा जास्त क्षेत्रासाठी त्यांच्या क्षेत्रानुसार प्रती हेक्टर रु.५,००० (२ हेक्टरच्या मर्यादेत) अर्थ सहाय्य मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वरीलप्रमाणे अर्थसहाय्य अदा करण्याकरिता कापूस उत्पादक शेतकऱ्यांसाठी रु.१५४८.३४ कोटी व सोयाबीन उत्पादक शेतकऱ्यांसाठी रु.२६४६.३४ कोटी अशा एकूण रु.४१९४.६८ कोटी इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च कापूस, सोयाबीन व इतर तेलबिया उत्पादक शेतकऱ्यांच्या उत्पादकता वाढ व मुल्यसाखळी वाढ विशेष कृती योजनेच्या लेखाशीर्ष २४०१B४१९ खाली करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी कापूस व सोयाबीन उत्पादक शेतक-यांसाठीचे पात्रतेचे निकष पुढीलप्रमाणे असतील :

(१) राज्यातील सन २०२३ च्या खरीप हंगामातील कापूस व सोयाबीन उत्पादक शेतकऱ्यांना ०.२ हेक्टरपेक्षा कमी क्षेत्रासाठी सरसकट रु.१००० तर ०.२ हेक्टरपेक्षा जास्त क्षेत्रासाठी त्यांच्या क्षेत्रानुसार प्रती हेक्टर रु.५,००० (२ हेक्टरच्या मर्यादेत) अर्थ सहाय्य अनुज्ञेय राहील.

(२) राज्यातील ज्या कापूस व सोयाबीन उत्पादक शेतकऱ्यांनी सन २०२३ च्या खरीप हंगामामध्ये ई-पीक पाहणी ॲप/पोर्टलद्वारे कापूस व सोयाबीन लागवडीची नोंद केली आहे असे नोंदणीकृत शेतकरीच अर्थसहाय्याकरीता पात्र राहतील.

(३) ई-पीक पाहणी ॲप/पोर्टल वर नोंद असलेल्या क्षेत्रानुसार व त्याप्रमाणातच परिगणना करून अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील.

(४) सदर शेतकऱ्यांना ऑनलाईन प्रणाली व सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे शेतक-याच्या आधार लिंक्ड बँक खात्यामध्ये केवळ थेट लाभ हस्तांतरणाच्या (DBT) माध्यमातूनच अर्थसहाय्य जमा करण्यात येईल.

(५) सदर योजना फक्त सन २०२३ च्या खरीप हंगामातील कापूस व सोयाबीन उत्पादक शेतकऱ्यांसाठीच मर्यादीत राहील.

५. सदरचे अर्थसहाय्य वितरीत करण्यासाठीची कार्यपध्दती स्वतंत्रपणे कळविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय मा.मंत्रिमंडळाच्या दि.११ जुलै, २०२४ रोजीच्या बैठकीत मिळालेल्या मान्यतेनूसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२२८/२०२४/व्यय-१, दि.२९ जुलै, २०२४ नुसार प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२९१७५३२७४४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2024.07.29 18:08:17 +05'30'

**( संतोष कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा.उप मुख्यमंत्री तथा गृह मंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा.उप मुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. अध्यक्ष , महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. मंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१०. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
११. मा. उपाध्यक्ष , महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१२. सर्व सन्माननीय विधानसभा व विधानपरिषद सदस्य.
१३. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१४. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८. प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२०. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२१. महासंचालक माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ .
२२. आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२३. सर्व जिल्हाधिकारी .
२४. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२५. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२६. सर्व विभागीय कृषि सह संचालक.
२७. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
२८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२९. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
३०. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर.
३१. सर्व सहसचिव/उपसचिव/अवरसचिव/कार्यासन अधिकारी, (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३२. वित्त विभाग, व्यय १/अर्थसंकल्प १३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३३. नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३४. निवड नस्ती (कार्यासन-४-अे).